**सन २०१७-१८ च्या टंचाई कालावधीत ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात अनुदान वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.७३ /पापु-१४**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १६ ऑगस्ट, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
३) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्रमांक: मशा/टंचाई/कार्या-६/कावि-२०७३१/२०१८, दिनांक १४ मे, २०१८
४) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्रमांक: निधीमा/२०१८/प्र.क्र.०४/तामे २३(३) जा.क्र.२६१, दिनांक १२ जून, २०१८
५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांक: विकास/अका/कावि/९३३/१८, दिनांक २७ जून, २०१८
६) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक: जा.क्र. २०१८/महसूल/पाटं/प्र.क्र.१३, दिनांक १९ जून, २०१८
७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग विभाग क्रमांक: एससीवाय-०८/२०१८/प्र.क्र.३८/म-११, दिनांक १३ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च “२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य” या लेखाशीर्षाखाली महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. २०१७-१८ च्या तसेच त्यापूर्वीच्या टंचाई

कालावधीत केलेल्या / करावयाच्या उपायोजनांसाठी संदर्भ क्र. ३ ते ६ मधील पत्रान्वये निधी मागणीचा प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला आहे. तसेच विभागाने शासन स्तरावरुन मान्यता दिलेल्या उपाययोजनांकरिता निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता महसूल व वन (मदत व पुनर्वसन ) विभागाने त्यांच्या दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ च्या शासन निर्णयाद्वारे वितरीत केलेल्या निधीमधून विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२४५००९३ **अंतर्गत रु. १०४८८.९७ लाख (अक्षरी रुपये एकशे चार कोटी अठ्ठयाऐंशी लाख सत्याण्णव हजार मात्र )** इतका निधी विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, अमरावती व औरंगाबाद यांना प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांनी सदर निधी सोबत जोडलेल्या **प्रपत्रानुसार** संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

२) सन २०१७-१८ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा. अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) ज्या ग्रामीण तथा नागरी उपाययोजनांना टंचाई अंतर्गत शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आली आहे, त्या योजनांसाठी सदर शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार योजनेच्या सुरवातीस ५० टक्के व योजना पूर्ण झाल्यानंतर ५० टक्के निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार नागरी योजनांबाबत जिल्हाधिकारी यांनी तसेच ग्रामीण योजनांबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा

परिषद यांनी सदर योजना १०० टक्के पूर्ण झाल्याची खात्री केल्याशिवाय उर्वरीत संपूर्ण निधी संबंधितांना वितरीत करु नये.

४) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

५) ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीची ज्या जिल्हाधिका-यांकडून उपाययोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झालेली नाहीत, त्यांनी सन २०१६-१७ च्या वर्षांत वितरीत केलेल्या निधीची संपूर्ण खर्चाची (१०० टक्के) **उपाययोगिता प्रमाणपत्रे तसेच सन २०१७-१८या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीची किमान ७५ टक्के उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाली असल्याची खातरजमा झाल्यानंतरच संबंधित जिल्हाधिकारी यांना निधी वितरीत करण्यात यावा.**

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग दि. १८.०४.२०१७ व ३०.०४.२०१७ मधील अटींची पुर्तता ज्या जिल्हयांकडून पूर्ण झाली आहे. त्याच जिल्हयांना निधी वितरीत करण्यात यावा.

७) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

८) ज्या नागरी तथा ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात येऊ नये. सदर निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी योजना राबविणाऱ्या संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेकडे तात्काळ वितरीत करावा. तसेच ज्या उपाययोजना महानगरपालिका / नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहेत, त्याचेकरिता जिल्हाधिकाऱ्यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडे वितरीत करावा.

९) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

१०) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.

११) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१२) सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१३) **याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) (दत्तमत)(वेतनेत्तर) ३१, सहायक अनुदाने" या उपलेखाशीर्षां उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१४)आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील विभागनिहाय खालीलप्रमाणे आहे. याप्रमाणेच विभागीय आयुक्तांनी प्रपत्र “अ” मध्ये नमुद केल्यानुसार जिल्हानिहाय संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना निधीचे वितरण करावे.

| **अ.क्र.** | **विभाग** | **एकूण (रक्कम रु. लाखात)** |
|---|---|---|
| १ | कोकण | १६२.१८ |
| २ | नाशिक | १५६२.४४ |
| ३ | औरंगाबाद | ११७२.६४ |
| ४ | अमरावती | ७५९१.७१ |
| **एकूण** | | **१०४८८.९७** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०८१६१०२९४१२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R. B. Kumatgi

Digitally signed by R. B. Kumatgi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96d578360190574be078f90f44cde8446df6e461003bf3672f18f9dbab1603da, cn=R. B. Kumatgi
Date: 2018.08.16 12:52:50 +05'30'

**( राजेंद्र कुमटगी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,

६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद, व अमरावती
९. जिल्हाधिकारी, ठाणे, धुळे, नंदुरबार, जळगांव, जालना, अमरावती, बुलडाणा, वाशिम, यवतमाळ व अकोला
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, धुळे, नंदुरबार, जळगांव, जालना, अमरावती, बुलडाणा, वाशिम, यवतमाळ व अकोला
११.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, धुळे, नंदुरबार, जळगांव, जालना, अमरावती, बुलडाणा, वाशिम, यवतमाळ व अकोला
१२.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे, धुळे, नंदुरबार, जळगांव, जालना, अमरावती, बुलडाणा, वाशिम, यवतमाळ व अकोला
१३.कार्यकारी अभियंता (जलव्यवस्थापन), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
१४.आयुक्त, महानगरपालिका, अकोला
१५.मुख्याधिकारी, नगर परिषद, यवतमाळ, वाशिम, मंगरुळपीर जिल्हा वाशिम, मालेगांव जिल्हा वाशिम, मुर्तिजापूर जिल्हा अकोला, बार्शिटाकळी जिल्हा अकोला, मेहकर जिल्हा बुलडाणा व चिखलदरा, जिल्हा अमरावती.
१६. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७. उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१८. पापु-१४ संग्रहासाठी.

प्रपत्र -अ

खालीलप्रमाणे विभाग / जिल्हा निहाय निधीचे वितरण करण्यात यावे.

(रक्कम रु.लाखात)

| अ. क्र. | विभाग | विभागीय आयुक्तांकडून प्राप्त मागणीच्या अनुषंगाने खालील प्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे. | शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या ग्रामीण भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजना (यादी प्रपत्र-ब) | शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजना (यादी प्रपत्र-क) | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | कोकण | ५८.००<br>ठाणे – ५८.०० | १०४.१८<br>ठाणे – १०४.१८ | ०.०० | १६२.१८ |
| २ | नाशिक | १५६२.४४<br>धुळे – ६५.००<br>नंदुरबार – ७९.४४<br>जळगांव – १४१८.०० | ०.०० | ०.०० | १५६२.४४ |
| ३ | औरंगाबाद | ६७७.१४<br>जालना – ६७७.१४ | ४९५.५०<br>जालना – ४९५.५० | ०.०० | ११७२.६४ |
| ४ | अमरावती | ४३८१.६४<br>अमरावती – १३१३.३०<br>बुलडाणा – १३७१.०१<br>वाशिम – ३००.००<br>यवतमाळ – १३९७.३३ | १३२२.९०<br>अकोला – ६५५.६५<br>बुलडाणा – २५४.९२<br>अमरावती – १२३.९९<br>यवतमाळ – २८८.३४ | १८८७.१७<br>अकोला – ५२२.७९<br>बुलडाणा – १७५.९४<br>अमरावती – ५९.१०<br>यवतमाळ – ३८३.४३<br>वाशिम – ७४५.९१ | ७५९१.७१ |
| **एकूण** | | **६६७९.२२** | **१९२२.५८** | **१८८७.१७** | **१०४८८.९७** |

टिप : शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या नागरी तथा ग्रामीण भागातील उपाययोजनांची माहिती सोबतच्या प्रपत्र 'ब' व 'क' मध्ये देण्यात आली आहे त्यानुसार योजना निहाय निधी वाटप करण्यात यावा.

****************

**प्रपत्र - "ब"**

**शासन स्तरावरुन मान्यता दिलेल्या ग्रामीण क्षेत्रातील योजनांसाठी खालीलप्रमाणे निधी वाटप करण्यात येत आहे.**

| अ. क्र. | शासन निर्णय क्रमांक, दिनांक व योजनेचे नाव | निधी वाटप रक्कम ( रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | टंचाई २०१७/प्र.क्र.१४५/पापु १४ दि. ०३.११.२०१७<br>जालना जिल्हयातील परतूर, मंठा व जालना तालुक्यातील ९६ गावातील नळ योजनांची विशेष दुरुस्ती. | ४२१.११ |
| २ | टंचाई - २०१७/प्र.क्र.१६८/पापु-१४, दि. १९.१२.२०१७<br>अकोला जिल्हा व तालुक्यातील खांबोरा ६४ खेडी प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेतील ४४ गावांना तातडीची पाणी पुरवठा योजना. | १८४.२३ |
| ३ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ३७ /पापु-१४, दि. ०५.०३.२०१८<br>मौजे खर्डी, ता. शहापूर, जि. ठाणे येथील पुरक पाणी पुरवठा योजना. | १०४.१८ |
| ४ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ४३ /पापु-१४, दि. ०६.०३.२०१८<br>अमरावती जिल्हयातील दर्यापुर अंजनगाव व भातकुली तालुक्यातील १५६ गांवे व २ शहरे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेतील रामतिर्थ ते नांदरुण दरम्यानच्या पाईपलाईनच्या विशेष दुरुस्ती. | १२३.९९ |
| ५ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ६२ /पापु-१४, दि. १०.०४.२०१८<br>मैाजा आरंभी, ता. दिग्रस, जि. यवतमाळ येथील तात्पुरत्या पुरक नळ योजनेचा प्रस्ताव | ४७.२८ |
| ६ | टंचाई २०१८/प्र.क्र. ३१ /पापु-१४, दि. १०.०४.२०१८<br>यवतमाळ जिल्हयातील माळपठार व ४० गांवे प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजनेअंतर्गत तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव. | २४१.०६ |
| ७ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ६४ /पापु-१४, दि. १०.०४.२०१८<br>मौजा धोत्रा नंदई, ता. देऊळगाव राजा, जि. बुलडाणा येथील तातपुरती नळ योजनेचा प्रस्ताव | ४५.२२ |
| ८ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ६९ /पापु-१४, दि. १९.०४.२०१८<br>मौजा साखरखेर्डा, ता. सिंदखेड राजा, जि. बुलडाणा येथील नळ योजनेच्या विशेष दुरुस्ती. | १९५.२८ |
| ९ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ८६ /पापु-१४, दि. २५.०४.२०१८<br>मौजे सुटाळा बु, तालुका खामगाव, जिल्हा बुलडाणा येथील तात्पुरत्या पुरक नळ पाणी पुरवठा योजना. | १४.४२ |
| १० | टंचाई २०१८ /प्र.क्र. ९० /पापु-१४, दि. ०७.०५.२०१८<br>मौजे राजूर तालुका भोकरदन, जिल्हा जालना येथील तात्पुरत्या पूरक नळ योजना. | ४९.४२ |
| ११ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ९२ /पापु-१४, दि. ०७.०५.२०१८<br>नेर, तालुका व जिल्हा जालना येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्ती. | २४.९७ |
| १२ | टंचाई २०१६ /प्र.क्र. २४७ /पापु-१४, दि. १६.०५.२०१७<br>अकोला जिल्हयातील काटेपूर्णा प्रकल्प ते खांबोरा उन्नई बंधाऱ्यापर्यंत पाईपलाईन टाकणे टंचाई अंतर्गत विशेष बाब प्रस्ताव. | ४७१.४२ |
| | **एकूण** | **१९२२.५८** |

| अ. क्र. | विभाग निहाय गोषवारा | निधी वाटप रक्कम ( रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | कोकण | १०४.१८ |
| २ | औरंगाबाद | ४९५.५० |
| ३ | अमरावती | १३२२.९० |
| **एकूण** | | **१९२२.५८** |

****************

**प्रपत्र - "क"**

**शासन स्तरावरुन मान्यता दिलेल्या नागरी क्षेत्रातील योजनांसाठी खालीलप्रमाणे निधी वाटप करण्यात येत आहे.**

| अ. क्र. | शासन निर्णय क्रमांक, दिनांक व योजनेचे नाव | निधी वाटप रक्कम ( रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | टंचाई २०१७/प्र.क्र.१४३/पापु १४, दि. १९.१२.२०१७<br>अकोला जिल्हयातील मुर्तिजापूर शहरासाठी तातडीची पाणी पुरवठा योजना. | ३२५.५० |
| २ | टंचाई - २०१७/प्र.क्र.१६९/पापु-१४, दि. १९.१२.२०१७<br>वाशिम शहराला पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत तातडीची पाणी पुरवठा योजना. | २९७.५६ |
| ३ | टंचाई २०१८/प्र.क्र. ११/पापु-१४, दि. ०६.०२.२०१८<br>यवतमाळ शहराकरिता निळोणा व चापडोह धरणातून मृतसाठा उचलण्याबाबत तातडीची उपाययोजना. | ६६.४३ |
| ४ | टंचाई २०१८/प्र.क्र. २१/पापु-१४, दि. १४.०२.२०१८<br>मालेगाव शहर तातडीची पाणी पुरवठा योजना ता. मालेगाव, जि. वाशिम. | ६४.११ |
| ५ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ५१ /पापु-१४, दि. १५.०३.२०१८<br>वाशिम जिल्हयातील मंगरुळपीर शहरासाठी टंचाई अंतर्गत तातडीच्या पाणी पुरवठा योजना. | ३८४.२४ |
| ६ | टंचाई २०१८/प्र.क्र. ३० /पापु-१४, दि. १९.०४.२०१८<br>बुलडाणा जिल्हयातील मेहकर शहर नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्ती. | १७५.९४ |
| ७ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ८३ /पापु-१४, दि.२५.०४.२०१८<br>अकोला जिल्हयातील बार्शिटाकळी नगरपंचायतीच्या तात्पुरत्या पुरक नळ पाणी पुरवठा योजना. | २२.४६ |
| ८ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ८८ /पापु-१४, दि.०७.०५.२०१८<br>अमरावती जिल्हयातील चिखलदरा नगर परिषदेची नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्ती. | ५९.१० |
| ९ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ४६ /पापु-१४, दि.०७.०५.२०१८<br>अकोला महानगरपालिका क्षेत्रातील पाणी टंचाई अंतर्गत उपाययोजना. | ११५.४३ |
| १० | टंचाई २०१८ /प्र.क्र. ७२ /पापु-१४, दि.१०.०५.२०१८<br>यवतमाळ शहर टंचाई निवारणार्थ करावयाच्या उपाययोजना | ३१७.०० |
| ११ | टंचाई २०१८ /प्र.क्र. ४६ /पापु-१४, दि. ११.०६.२०१८<br>अकोला महानगरपालिका क्षेत्रातील पाणी टंचाई अंतर्गत उपाययोजना. | ५९.४० |
| **एकूण (अमरावती विभाग)** | | **१८८७.१७** |

****************